विधानसभा निवडणूक-२०१९ करिता पोलीस अधिक्षक, नाशिक (ग्रामीण) यांनी बंदोबस्तासाठी भाडेतत्वावर अधिग्रहित केलेल्या खाजगी वाहनांच्या भाड्यापोटी देय असलेली रु. ३,०२,३०७/- इतकी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-०८२०/प्र.क्र.६८/विशा १ अ**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : ०८ सप्टेंबर, २०२०.

संदर्भ :- १. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं /३०/वाह.अधि. वि.स.नि.-२०१९/नाशिक ग्रा./३८/२०२०, दिनांक ०५.०३.२०२०

२. विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक यांचे पत्र क्र.विपोमनि/नाप /प्रबंधक/वि.स.नि./अधिग्रहन वाहन/२०२०/६९४, दिनांक ०६.०२.२०२०.

३. पोलीस अधिक्षक कार्यालय, नाशिक (ग्रामीण) यांचे पत्र क्र. पशा/कक्ष-४/विसनि./ अधिग्रहन वाहन/२१३/२०१९, दिनांक २८.०१.२०२०.

प्रस्तावना :-

पोलीस अधिक्षक, नाशिक (ग्रामीण) यांनी विधानसभा निवडणुक २०१९ करीता निवडणुकीचे वेळी कायदा व सुव्यवस्था राखण्याचे अनुषंगाने पोलीस दलाकडे उपलब्ध असलेली वाहने अपुरी असल्यामुळे एकूण ७८ खाजगी वाहने भाडेतत्वावर अधिग्रहित करण्यात आली होती. प्रादेशिक परिवहन कार्यालय, नाशिक यांच्या दिनांक ३०.०४.२०१९ रोजीच्या पत्रात नमुद करण्यात आलेल्या भाडे दरपत्रकानुसार शासकीय कामासाठी सदरची वाहने भाडेतत्वावर अधिग्रहित करण्यात आली होती. सदर भाडेतत्वावर घेतलेल्या एकूण ७८ खाजगी वाहनांच्या भाड्यापोटी एकुण रु. ३,०२,३०७/- (रूपये तीन लाख दोन हजार तीनशे सात फक्त) इतकी देय रक्कम अदा करण्यास कार्योत्तर मंजुरी मिळणेबाबतच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजुरी देण्याची व सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून सदर रक्कम खर्च करण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

पोलीस अधिक्षक, नाशिक (ग्रामीण) यांनी विधानसभा निवडणुक २०१९ करीता निवडणुकीचे वेळी कायदा व सुव्यवस्था राखण्याचे अनुषंगाने पोलीस दलाकडे उपलब्ध असलेली वाहने अपुरी असल्यामुळे एकूण ७८ खाजगी वाहने भाडेतत्वावर अधिग्रहित करण्यात आली होती. प्रादेशिक परिवहन कार्यालय, नाशिक यांच्या दिनांक ३०.०४.२०१९ रोजीच्या पत्रात नमुद करण्यात आलेल्या भाडे दरपत्रकानुसार शासकीय कामासाठी सदरची वाहने भाडेतत्वावर अधिग्रहित करण्यात आली होती. सदर भाडेतत्वावर घेतलेल्या एकूण ७८ खाजगी वाहनांच्या भाड्यापोटी एकुण रु. ३,०२,३०७/- (रूपये तीन लाख दोन हजार तीनशे सात फक्त) इतक्या रक्कमेस वित्तीय वर्ष २०२०-२०२१ च्या विहित लेखाशिर्षाखालील शिल्लक अनुदानातून अदा करण्याच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च मागणी क्र. “बी-१, २०५५-पोलीस, १०९-जिल्हा पोलीस, (००) (०१)-जिल्हा पोलीस बल (२०५५०१६८), इतर खर्च-५०” या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-१ मधील अनुक्रमांक ६, नियम-४०(१) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९०८१३०९०७१६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Deepak Tukaram Kharat

Digitally signed by Deepak Tukaram Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=902e21bb580b52a1e246b37b697ca20f0db2834da41f6840afd03916d8ed1b76, serialNumber=d8bd67045829179609f51b88a183cd0a4a3acd98db48b22b5faf5a9efc780e70, cn=Deepak Tukaram Kharat
Date: 2020.09.08 13:09:59 +05'30'

**( दि. तु. खरात )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक.
३. पोलीस अधिक्षक, नाशिक (ग्रामीण),
४. जिल्हाधिकारी, नाशिक.
५. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
६. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती.